मुंबई लगतच्या अरबी समुद्रात छत्रपती शिवाजी महाराज यांचे आंतरराष्ट्रीय दर्जाचे स्मारक उभारण्याबाबत. ..
निविदा सूचना प्रसिद्ध करण्यासाठीच्या जाहिरात खर्चास मंजूरी देण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र. स्मारक ३११६/९०९/प्र.क्र. ३६०/२९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक: २० मार्च, २०१७

**प्रस्तावना :-**

मुंबई लगतच्या अरबी समुद्रात छत्रपती शिवाजी महाराजांचे आंतरराष्ट्रीय दर्जाचे स्मारक उभारण्यासाठी जल /भूमीपूजन करण्यात आले आहे. सदरहू स्मारकाचे काम विहित मर्यादेत पूर्ण करणे आवश्यक असल्याने आणि सदर स्मारकाच्या प्रकल्प कामासाठी स्पर्धात्मक दर प्राप्त करण्याच्या अनुषंगाने निविदा आंतरराष्ट्रीय / राष्ट्रीय स्तरावरुन मागविण्यासाठी करण्यात आलेल्या जाहिरातीच्या खर्चास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय: -**

छत्रपती शिवाजी महाराजांच्या अरबी समुद्रामध्ये उभारावयाच्या स्मारकाच्या प्रकल्प कामाच्या निविदा आंतरराष्ट्रीय / राष्ट्रीय स्तरावरुन मागविण्याच्या अनुषंगाने निविदा सूचना आंतरराष्ट्रीय / राष्ट्रीय स्तरावरील वृत्तपत्रात प्रसिद्ध करण्यासाठीच्या रक्कम रु. १०,०८,१२९/- (रुपये दहा लाख आठ हजार एकशे एकोणतीस फक्त) इतक्या खर्चास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर खर्चाची रक्कम आहरीत करण्यासाठी उप अभियंता, छत्रपती शिवाजी महाराज स्मारक प्रकल्प विभाग, सार्वजनिक बांधकाम विभाग, कुलाबा, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी व अधीक्षक अभियंता, मुंबई बांधकाम मंडळ, चेंबूर, मुंबई यांना नियंत्रकीय अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर निधीच्या विनियोगाबाबत तसेच महालेखापाल यांच्या लेख्याशी खर्च ताळमेळ घालण्याची कार्यवाही करावी. निधी प्रत्यक्ष वितरीत केल्यानंतर नियमानुसार उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल यांना पाठवून त्याची प्रत शासनास सादर करण्याची जबाबदारी अधिक्षक अभियंता, मुंबई (सां.बा.), मंडळ, मुंबई यांची राहील.

३. यासाठी होणारा खर्च मागणी क्रमांक ए- ९, लेखाशीर्ष ४०५९, सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च ०१, कार्यालयीन इमारत ०५१ बांधकामे, राज्य योजनांतर्गत योजना (००) (०१) अरबी समुद्रात छत्रपती शिवाजी महाराजांचे स्मारक उभारणे (४०५९ २५२१) ५३, मोठी बांधकामे या लेखाशीर्षा खालील सन २०१६-१७ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हे आदेश, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग- दोन मधील अनुक्रमांक- ८, नियम क्र. १७ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन तसेच माहिती व जनसंपर्क विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. १८५, जाहिरात शाखा/का.५, दिनांक २/२/२०१७ च्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेताक २०१७०३२०१४४४१४८१०७ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra M Jadhav

Digitally signed by Rajendra M Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=GENERAL ADMINISTRATION DEPT., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=656ebca17998fd5c29178a5abcf1aa60d72bd5515ddc791d9ad9786418f07e4f, cn=Rajendra M Jadhav
Date: 2017.03.20 14:45:17 +05'30'

**(रा. मा. जाधव)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य,मंत्रालय,मुंबई,
३. अपर मुख्य सचिव,सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई,
४. प्रधान सचिव (र.व का.),सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई,
५. सचिव (बांधकामे),सार्वजनिकबांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई,
६. संचालक, (माहिती व जनसंपर्क महासंचालनालय), मंत्रालय,मुंबई,
७. मुख्य अभियंता, विशेष प्रकल्प सार्वजनिक बांधकाम विभाग,२५ मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई-४०० ०७१,
८. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई
९. महालेखापाल-१(लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई
१०. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
११. महालेखापाल-२ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
१२. अधिक्षक अभियंता, छत्रपती शिवाजी महाराज प्रकल्प विभाग, मुंबई बांधकाम मंडळ, प्रशासकीय इमारत, २रा मजला, रामचंद्र चेंबूरकर मार्ग, चेंबूर, मुंबई-४०० ०७१,
१३. कार्यकारी अभियंता, छत्रपती शिवाजी महाराज प्रकल्प विभाग, सार्वजनिक बांधकाम विभाग, बी. बी. आर. एस. कं. ५, भूखंड क्र.१२०, झूलेलाल मंदिराशेजारी, कफ परेड, कुलाबा, मुंबई
१४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१६. अवर सचिव (इमा-३), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. वित्त विभाग (व्यय-४/ अर्थसंकल्प-१४ ), मंत्रालय, मुंबई
१८. सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन-२५ ), मंत्रालय, मुंबई
१९. कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (कार्यासन-१४४३),मंत्रालय,मुंबई,
२०. निवड नस्ती ( कार्यासन-२९) सा.प्र.विभाग, मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.